**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. राजस १०१४/ प्र.क्र.३५/ ५ स,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक :- २ मे, २०१५

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१/१/२०१४

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.२०/५/२०१४

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.१९/१/२०१५

४) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंधक अधिनियम २००५

५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.राजस २०१४/प्र.क्र.३५७/५-स, दि.३१/१२/२०१४

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१/१०/२०१३ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरुन शासनाने गट-अ, गट-ब व गट-क या संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना/बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंधक अधिनियम

२००५ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) ची खालीलप्रमाणे स्थापना करण्यात येत आहे.

**नागरी सेवा मंडळ (१)**

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव (सहकार) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव (पणन) | सदस्य |
| ३ | सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |

उपरोक्त नागरी सेवा मंडळ (१) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०२१७३१३६५२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Pandurang S Deokar

Digitally signed by Pandurang S Deokar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandurang S Deokar
Date: 2015.05.02 17:32:58 +05'30'

**( पां. स. देवकर )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (सहकार/पणन /वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

६) अपर मुख्य सचिव (पणन/वस्त्रोद्योग), प्रधान सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई

७) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

९) कक्ष अधिकारी (१२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.मंत्रालय, मुंबई

१०) निवड नस्ती.